**राज्यातील बँकिंग परवाना नसलेल्या नागपूर, वर्धा व बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना त्यांचा CRAR किमान ७% होण्यासाठी शासकीय भागभांडवल व अनुदान स्वरुपात अर्थसहाय्य उपलब्ध करण्यास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन शुध्दीपत्र क्रमांक: जिमस १११८/प्र.क्र.१७५ /२-स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ५ डिसेंबर, २०१८

वाचा :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५ /२-स, दि.२७ मार्च, २०१५

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने दि.१७.११.२०१४ च्या पत्राद्वारे देशाती बँकिंग परवाना नसलेल्या २३ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे पुनरुज्जीवन करण्याबाबतच्या योजनेस मान्यता दिली होती. त्यामध्ये राज्यातील नागपूर, वर्धा व बुलडाणा या जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचा समावेश होता. सदर योजनेनुसार या तीन बँकांना “वाचा” येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये अर्थसहाय्य मंजूर करण्यात आले आहे. सदर अर्थसहाय्य मंजूर करताना “या तीनही बँकांवर संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली प्रशासकीय मंडळाची नियुक्ती करण्यात यावी” अशी अट घालण्यात आली होती. त्यानुसार तीनही बँकांवर संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली प्रशासकीय मंडळाची नियुक्ती करण्यात आलेले आहे. जिल्हाधिकारी हे जिल्हयाचे प्रमुख असून त्यांना हाताळाव्या लागणा-या इतर महत्त्वाच्या कामामुळे याकामासाठी वेळ देणे अडचणीचे होते. यासाठी सदर बँकेवरील प्रशासकीय मंडळाचे अध्यक्ष जिल्हाधिकारी यांचेऐवजी सहकार विभागातील वरिष्ठ अधिकारी यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्र :-**

उपरोक्त शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५ /२-स, दि.२७ मार्च, २०१५ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :-

(१) “शासन निर्णय" या मथळयाखालील परिच्छेद क्र.५ मधील दुस-या ओळीतील " संबधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी” या शब्दांऐवजी " सहनिबंधक अथवा वरिष्ठ/ अनुभवी जिल्हा उपनिबंधक दर्जाचा अधिकारी" असा बदल करण्यात यावा.

सदर शासन शुध्दीपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२०५११४००१८४०२ असा आहे. हे शासन शुध्दीपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2018.12.05 11:43:44 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
३) मा. विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य (सर्व)
४) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान महालेखाकार (लेखापरीक्षा-१/२), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
८) प्रधान महालेखाकार Voucher Level Computer Section (VLC), मुंबई
९) रिजनल डायरेक्टर, भारतीय रिझर्व्ह बँक, प्रादेशिक कार्यालय, नागपूर
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) विभागीय आयुक्त, नागपूर व अमरावती
१३) मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड, प्रादेशिक कार्यालय, पुणे
१४) जिल्हाधिकारी, नागपूर, वर्धा व बुलडाणा
१५) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन/ले.प.), नागपूर व अमरावती
१६) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, नागपूर, वर्धा व बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या.
१८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर, वर्धा व बुलढाणा
१९) जिल्हा विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, नागपूर, वर्धा व बुलढाणा
२०) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
२१) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर, वर्धा व बुलढाणा
२२) वित्त विभाग (व्यय-२ व अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई
२३) नियोजन विभाग (का.१४३१), मंत्रालय, मुंबई
२४) निवड नस्ती